नाशिक रोड मध्यवर्ती कारागृह येथील कर्मचारी निवासस्थान बांधकामाच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

### शासन निर्णय क्र. जेएलएम-०९२२/प्र.क्र.१३८/ तुरुंग-२,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २६ मे, २०२३.

वाचा:

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.बीएलडी/नामका/शा.निवासस्थान व इतर बांधकाम/२५३५/२२ कक्ष-६ (३), पुणे-१, दिनांक ३०.३.२०२२.

२. नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र. ससमा २०१०/प्र.क्र.४८ भाग-१/का-१४६१, दिनांक ११.६.२०१८.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम भाग-२, दिनांक २०.९.२०१९.

४. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५.९.२०१९.

५. सार्वजनिक बांधकाम विभाग, दिनांक २४.२.२०२३ रोजी आयोजित उच्चाधिकार सचिव समितीच्या बैठकीचे इतिवृत्त

प्रस्तावना:

नाशिकरोड मध्यवर्ती कारागृह येथील विविध इमारतींच्या बांधकामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्यासंदर्भातील प्रस्ताव वाचा येथील क्र.१ च्या पत्रान्वये अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडून प्राप्त झाले आहेत. त्यापैकी नाशिकरोड मध्यवर्ती कारागृह येथील कर्मचारी निवासस्थान बांधकामाच्या दोन अंदाजपत्रकांची प्रत्येकी किंमत रु.१९.८६ कोटी इतकी आहे. वाचा क्र. ४ येथील शासन परिपत्रकानुसार सदर अंदाजपत्रकांना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांनी तांत्रिक मान्यता दिली आहे. सदर दोन्ही अंदाजपत्रकांची किंमत रु.१५ कोटी पेक्षा जास्त असल्याने संदर्भ.क्र.२ येथील शासन परिपत्रकानुसार सार्वजनिक बांधकाम विभाग अंतर्गत सचिव समितीने वाचा क्र.५ नुसार प्रत्येकी रु.१८.५४ कोटी इतक्या रकमेच्या दोन अंदाजपत्रकांना मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने नाशिकरोड मध्यवर्ती कारागृह येथील कर्मचारी निवासस्थान बांधकामाच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

नाशिकरोड मध्यवर्ती कारागृह येथील कर्मचा-यांसाठी नवीन निवासस्थानांच्या खालील तक्यात नमूद बांधकामांच्या खर्चाच्या अंदाजपत्रकांना या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

कामांची यादी

| अ.क्र. | **बांधकामाचे नाव** | **एकूण किंमत (रु.कोटी)** |
|---|---|---|
| १ | कर्मचारी यांचेसाठी ६४ (बिल्डींग क्र. १ ते ४) वर्ग-३ (टाईप-२) ची नविन निवासस्थाने | रु.१८.५४ |
| २ | कर्मचारी यांचेसाठी ६४ (बिल्डींग क्र. ५ ते ८) वर्ग-३ (टाईप-२) ची नविन निवासस्थाने | रु.१८.५४ |

२. या साठी होणारा खर्च मागणी क्र. एच-८, ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च (४०५९ ०९१२) (०१) (१०१)/ (११) (०१) ( तुरुंग) (योजनांतर्गत योजना) या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक २०.९.२०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र.१ व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४(१) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या पूर्ण अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०५२६११४०४१५७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SEEMA TUSHAR SAWANT

Digitally signed by SEEMA TUSHAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=15a6230fe20fd947aa83047f5deb85c95659ceb098e76eb25dd802b0518e7d63, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9ED89E6C00B3FD549E02FB85DFE0767F96018A29CCAC79EC62AAFD247DECECE8, cn=SEEMA TUSHAR SAWANT
Date: 2023.05.26 11:41:18 +05'30'

**(सीमा तु. सावंत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (अपील व सुरक्षा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३) सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक,कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५) कारागृह उपमहानिरिक्षक, मध्य विभाग,
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
११) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
१२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,
१३) अधीक्षक, नाशिकरोड मध्यवर्ती कारागृह,
१४) निवडनस्ती तुरुंग २, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.